राज्यामध्ये ऑक्सिजन प्लांट सुरु करण्यासाठी
BHEL प्राधिकरणास रक्कम वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन**
**शासन निर्णय क्र.आव्यप्र-२०२१/प्र.क्र.१०२-अ/आव्यप्र-१**
मंत्रालय, मुंबई ३२.
दि. २१.०३.२०२४

**वाचा:-** १) शासन निर्णय क्र. आव्यप्र-२०२०/प्र.क्र.१०२-अ/आव्यप्र-१, दि. ०५ ऑक्टोबर, २०२१.
२) शासन निर्णय क्र.आव्यप्र-२०२०/प्र.क्र.१०२-अ/आव्यप्र-१ दि. २५ फेब्रुवारी, २०२२
३) शासन निर्णय क्र.आव्यप्र-२०२०/प्र.क्र.१०२-अ/आव्यप्र-१ दि .२३ मे, २०२२.
४) शासन निर्णय क्र.आव्यप्र-२०२०/प्र.क्र.१०२-अ/आव्यप्र-१ दि. ७ सप्टेंबर, २०२२.
५) शासन निर्णय क्र.आव्यप्र-२०२१/प्र.क्र.१०२-अ/आव्यप्र-१ दि. १८ जानेवारी, २०२३
६) शासन निर्णय क्र.आव्यप्र-२०२१/प्र.क्र.१०२-अ/आव्यप्र-१ दि. २९ मार्च २०२३.

**प्रस्तावना:**

दि. १५ जुन, २०२१ रोजी झालेल्या राज्य कार्यकारी समितीच्या बैठकीत, राज्यातील गंभीर परिस्थितीचा विचार करुन केंद्र शासनाच्या प्राधिकरणाकडून ऑक्सिजन प्लांट लावण्यासाठी खरेदी प्रक्रिया राबविण्याबाबत निर्णय घेण्यात आला. त्या निर्णयान्वये CSIR यांना प्रकल्प व्यवस्थापक म्हणून नियुक्ती करण्यात आली व राज्यामध्ये १० ऑक्सिजन प्लांट उभारण्यासाठी भारत हेवी इलेक्ट्रीकल्स लि. (BHEL) यांना कळविण्यात आले होते. त्यानूसार या केंद्र शासनाच्या कंपन्यांना दि.१५ जून, २०२१ रोजी कार्यादेश देण्यात आले.

संदर्भ क्र. ६ च्या शासन निर्णयान्वये BHEL प्राधिकरणास दिलेल्या कार्यादेशात नमूद केल्याप्रमाणे १० ऑक्सिजन प्लांटपैकी चौथ्या प्लांटचा पुरवठा झाला आहे तसेच सातव्या प्लांटची FAT(Factory Approve Test) झाली असल्याने प्राधिकरणाशी झालेल्या कराराच्या अनुषंगाने व कार्यादेशात नमूद केल्यानुसार प्लांन्टसाठी दुसऱ्या व तिसऱ्या हप्त्याची रक्कम रु.८७,९६,०००/- (रु. सत्याऐंशी लक्ष शहयान्नव हजार फक्त) वितरीत करण्यात आली आहे. आठव्या प्लांटची (Factory Approve Test) झाली असल्याने व पाचव्या ऑक्सिजन प्लांट नाशिक जिल्हा येथे पुरवठा केल्याने हप्त्यानुसार रक्कम वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचारधीन आहे.

**शासन निर्णय:**

BHEL प्राधिकरणास दिलेल्या कार्यादेशात नमूद केल्याप्रमाणे १० ऑक्सिजन प्लांटपैकी पाचव्या प्लांटचा पुरवठा झाला आहे. तसेच आठव्या प्लांटची FAT (Factory Approve Test) झाली असल्याने प्राधिकरणाशी झालेल्या कराराच्या अनुषंगाने व कार्यादेशात नमूद केल्यानुसार प्लांन्टसाठी दुसऱ्या व तिसऱ्या हप्त्याची रक्कम अदा करावयाचा असल्याने त्यासाठी होणारी एकूण रक्कम रु. ९०,७४,४००/-(रु. नव्वद लक्ष चौऱ्याहत्तर हजार चारशे फक्त) वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | प्लांटचा टप्पा | देय रक्कम |
|---|---|---|
| १ | तिसरा हप्ता - नाशिक येथे पुरवठा केल्याने | ५२,७०,४००/- (जीएसटी सह) |
| २ | दुसरा हप्ता - आठव्या प्लांन्टसाठी | ३८,,०४,००० /- |
| | **एकूण** | **९०,७४,४०० /-** |

उपरोक्त निधी आहरित करण्यासाठी श्री. अर्जुन पालव, लेखाधिकारी, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग आणि , वित्तीय सल्लागार तथा सह सचिव यांना अनुक्रमे आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

या कामी होणारा खर्च मागणी क्र. सी-६, २२४५, नैसर्गीक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य, ८०० इतर खर्च, (९१)(०२) कोविड १९ चा प्रादुर्भाव रोखण्यावरील खर्च लेखाशिर्ष (२२४५ ४१४१) ३१ - सहायक अनुदाने (सशर्त) या लेखाशिर्षांतर्गत सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात प्राप्त तरतुदीतून करण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२४०३२११५४९४६५०१९ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

HITENDRA YADAORAO DUFARE

Digitally signed by HITENDRA YADAORAO DUFARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=1170c73752038d1c4f8b3a8c1729f3f55bd8bd132 06eed4aead71a63b3f1dcee, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=02BBA6FFE202C222698F7E91A562A12409 6291549EBA836EE89EC11CB9F688D5, cn=HITENDRA YADAORAO DUFARE
Date: 2024.03.21 16:01:56 +05'30'

**( हितेंद्र दुफारे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत -**

१. उप सचिव, मुख्य सचिव कार्यालय, मंत्रालय, मुंबई.
२. महालेखाकार, महाराष्ट्र-१, मुंबई.
३. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
४. वित्तीय सल्लागार तथा सहसचिव, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग, मंत्रालय, मुंबई.
५. लेखाधिकारी, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग, मंत्रालय, मुंबई.
६. निवड नस्ती, आव्यप्र-१.